**सन २००९-१० ते २०११-१२ या वित्तीय वर्षाकरिता वितरीत करण्यात आलेली जुनी संगणक सामुग्री निर्लेखित करुन त्याबदल्यात नवीन १२५० संगणक खरेदी करण्याकरिताच्या रु. ४,२६,२६,०२५/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. संप्रिसा -२०१९/प्र.क्र. ६/का. ०७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ ऑक्टोबर, २०२०.

वाचा :- १) मा. मुख्यमंत्री व मा. मुख्य न्यायमूर्ती, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दिनांक १८.४.२०१६ रोजी झालेल्या संयुक्त बैठकीचे इतिवृत्त.
२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांची दिनांक १४.१०.२०१४, १८.१२.२०१५ व २०.०१.२०१६ ची पत्रं.
३) शासन ज्ञापन, समक्रमांक, दिनांक २४.०३.२०१७ व ३१.०३.२०१७.
४) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे दिनांक २०.१०.२०१८ रोजीचे पत्र.
५) शासन निर्णय, समक्रमांक, विधि व न्याय विभाग, दिनांक ३१.०१.२०१९.
६) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Spl./Comp./३१/२०२०, दिनांक ०९.१०.२०१९ व २२.०१.२०२०.

प्रस्तावना :-

ई प्रकल्प समिती, मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचेकडून सन २००९-१०, सन २०११-१२ या वित्तीय वर्षाकरिता मा. उच्च न्यायालय, मुंबई तसेच जिल्हा व सत्र न्यायालयांना संगणक सामुग्री वितरीत करण्यात आली होती. सदर संगणक सामुग्री निर्लेखित करुन त्याबदल्यात नवीन संगणक सामुग्री खरेदी करण्याकरिता येणाऱ्या रु. ४१,४४,५२,६८६.६८/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास मा. मुख्यमंत्री व मा. मुख्य न्यायमूर्ती, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दिनांक १८.०४.२०१६ रोजी झालेल्या बैठकीत सहमती दर्शविण्यात आलेली होती. त्यानुसार मा. उच्च न्यायालयास यापूर्वी संदर्भ क्र. ३ अन्वये रु. १६.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला होता. दिनांक १८.०४.२०१६ बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार रु. ४१,४४,५२,६८६.६८/- इतक्या रकमेपैकी उर्वरित रक्कम रु. २५.०० कोटी उपलब्ध करुन देण्याची

विनंती संदर्भ क्र. ४ अन्वये मा. उच्च न्यायालयाकडून करण्यात आली होती.त्यानुसार दिनांक ३१.०१.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.५.०० कोटी इतक्या रकमेच्या संगणक सामुग्री खरेदीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि संबंधित वित्तीय वर्षात खरेदी प्रक्रिया पूर्ण न झाल्यामुळे निधी वितरीत करण्यात आला नाही. आता मा. उच्च न्यायालयाने संदर्भ ६ अन्वये नवीन १२५० संगणक खरेदी करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याची विनंती केली आहे. सदर प्रस्तावास विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक ०९.०१.२०२० रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. यानुसार सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई तसेच जिल्हा व सत्र न्यायालयांना वितरीत करण्यात आलेली संगणक सामुग्री निर्लेखित करुन त्याबदल्यात नवीन १२५० संगणक खरेदी करण्याकरिताच्या रु. ४,२६,२६,०२५/- (रु. चार कोटी सव्वीस लक्ष सव्वीस हजार पंचवीस फक्त ) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार विहित पध्दतीने करण्यात यावी.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) "१७ संगणक खर्च" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२०-२१ मध्ये करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. संगणक हार्डवेअर सामुग्री निर्लेखित करुन त्याबदल्यात नवीन संगणक सामुग्री खरेदी करण्याकरिता रु. ४,२६,२६,०२५/- इतका निधी महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, जे ०००२ यांना वितरीत करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ मधील २ व ३ या अटींच्या अनुषंगाने प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या

अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३९३/२०२०/व्यय-५, दिनांक ०८.०९.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात त्वरीत शासनास सादर करावे.

७. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे. त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०६१७००५६८५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nitin Virsen Jiwane

Digitally signed by Nitin Virsen Jiwane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, serialNumber=38da45fc182de9210d4220cd41371018a4d6f00892e5d1478cba8413afb06c03, cn=Nitin Virsen Jiwane
Date: 2020.11.06 17:04:08 +05'30'

**( नि. वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. संचालनालय, लेखा व कोषागारे, ठाकरसी हाऊस ३, मुंबई पोर्ट ट्रस्ट, २ रा मजला, शुरजी वल्लभदास मार्ग, बेलार्ड इस्टे, मुंबई.
११. सह सचिव, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती.